# बराक ओबामा

एकमेवाद्वितीय



आपल्या सर्वांच्या –हो अगदी प्रत्येकाच्याच - काही ना काही कहाण्या असतात.

ही अशीच एक कहाणी आहे, एका हडकुळ्या आणि मजेदार नाव असलेल्या मुलाची. हा मुलगा पुढे जाऊन अमेरिकेच्या इतिहासाचा एक महत्त्वाचा भाग बनला.





तुम्ही त्याच्याबद्दल ऐकलेच असेल. त्याचे नाव आहे, बराक ओबामा. तो अमेरिकेचा चौव्वेचाळीसावा अध्यक्ष बनला.

बराक ओबामा यांचा जन्म
4 ऑगस्ट 1961 रोजी हवाई येथे
झाला. त्या काळी कृष्णवर्णीय
आणि गोरे लोक यांना समान हक्क
असावेत, हे काही लोकांना अमान्य
होते. बराकने अशा विचारांमध्ये
बदल घडवून आणला.





बराकची आई गौरवर्णीय
होती. ती कॅन्सस शहरातून
आली होती. बराकचे वडील
कृष्णवर्णीय होते. ते
केनियातून आले होते. बराक
हे नाव त्यांच्या वडिलांच्या
नावावरून पडले.





बराक दोन वर्षांचा होता तेव्हा त्याचे वडील दूर निघून गेले. बराक आणि त्याची आई हे त्याचे आजोबा ग्रॅम्प्स आणि आजी टूट यांच्यासोबत राहू लागले..

बराक आपल्या आईकडून जुन्या गोष्टी ऐकत असे. त्यातून तो आपल्या वडिलांची काल्पनिक छबी बनवत असे.

हवाई हे बराकसारख्या छोट्या मुलासाठी एक अद्भुत ठिकाण होते. बराक समुद्रकिनारी खेळत असे. त्याला तेथील भाताची कँडी आणि पोई नावाचे खाद्य खूप आवडत असे.





तो ग्रॅम्प्ससोबत फिरायला जात असे. वेगवेगळ्या प्रांतात फिरल्यामुळे त्याला वेगवेगळ्या वर्णांचे लोक दिसले.

1967 साली बराकच्या आईने पुन्हा लग्न केले. मग बराक आईसोबत इंडोनेशियाला गेला. बराकचे ते दिवस साहसी होते. बराकच्या घरामागे झाडांवर एक वानर लटकताना दिसे. जवळच्या तलावात मगरीची दोन पिल्ले पोहताना दिसत. बराक आणि त्याचे मित्र फुटबॉल खेळत आणि रातकिडे पकडत. बराकला खेळायला माया ही छोटी बहीणसुद्धा मिळाली.

पण काही दु:खद गोष्टीही होत्या. मासिके वाचताना त्याला त्यात त्याच्यासारखे कोणी दिसत नसे. शाळेतही कोणी त्याच्यासारखे नव्हते. बराकला आपण वेगळे आहोत, असे वाटू लागले. या सगळ्यांमध्ये आपण कुठे बसतो, असे वाटून तो गोंधळत असे.





बराकला सभोवती अनेक आजारी आणि भुकेले लोक दिसत. बराकच्या आईने काही लोकांची मदत केली. पण ती सर्वांचीच मदत करू शकत नव्हती.





बराकची आई शिक्षणाला खूप महत्त्व देत असे. बराकला घरी वाचण्यासाठी ती पुस्तके आणि मासिके आणत असे. ती बराकला दर दिवशी सकाळी अभ्यासासाठी लवकर जागे करत असे. कधीकधी बराक तक्रारीचा सूर काढे. पण आईचे मन तो मोडत नसे.

नि:पक्षपातीपणा, प्रामाणिकपणा आणि मेहनत यावर बराकच्या आईची श्रद्धा होती. बराकलाही तिने ही मूल्ये शिकवली. सर्व माणसे आतून एकसारखीच कनवाळू असतात, हे तिने बराकच्या मनावर ठसवले.



वयाच्या दहाव्या वर्षी बराकला हवाईच्या एका शाळेत शिकण्यासाठी शिष्यवृत्ती मिळाली. तिथे तो ग्रॅम्प्स आणि टूटसोबत राहू लागला. पुढच्याच वर्षी त्याची आई आणि मायाही तिथे राहायला आले.

बराक हुशार होता, पण परिपूर्ण नव्हता. तो कधी उदास असे तर कधी खूप रागवत असे. आपण कसे आहोत, हा त्याच्या डोक्यातील गोंधळ काही कमी झाला नव्हता.



त्यावर्षी उन्हाळ्याच्या दिवसांत बराकचे वडील त्याला भेटायला आले. त्यांनी बराकला एक बास्केटबॉल दिला. मग बराक दररोज बास्केटबॉल खेळू लागला. टूट त्याला यासाठी प्रोत्साहन देत असे.






हायस्कूलमध्ये बराक बास्केटबॉल संघात सहभागी झाला. संघातील खेळाडुंसोबत एका समान ध्येयासाठी खेळण्याचे शिक्षण त्याला मिळाले. यामुळे बराकच्या डोक्यातील गोंधळ हळूहळू कमी झाला.

बराक कॉलेजमध्ये जाऊ लागला. या काळात तो संग्रहालयांना भेटी देऊ लागला, त्याने अनेक व्याख्याने ऐकली, तो भरपूर पायी फिरला, त्याने खूप चिंतन केले. त्याला इंडोनेशियातील गरीब लोक आठवत. देशातील गरीबीबाबत आईची मते आठवत.

काही वर्षांपूर्वी वेगवेगळ्या वर्णांचे लोक सोबतीने शाळेत जाऊ शकत नसत, ते एकाच नळाचे पाणी पिऊ शकत नसत. कृष्णवर्णीयांना मतदानाचा हक्क नव्हता. ही असमानता बदलण्यासाठी संघर्ष करणाऱ्या लोकांकडून बराकला प्रेरणा मिळत गेली.







कॉलेजचे शिक्षण संपल्यावर लगेच बराक यांना शिकागो शहरात नोकरी मिळाली. मतदार म्हणून नोंदणी करण्यासाठी त्यांनी लोकांना मदत केली. मुलांना शाळेच्या वेळेनंतर गुंतवून ठेवण्यासाठी विविध उपक्रम त्यांनी सुरू केले. अनेक लोकांना त्यांनी नोकऱ्या मिळवून दिल्या. जसजसे ते लोकांना मदत करत गेले तसतसे त्यांना स्वत:ची ओळख पटत गेली. ते एकदा म्हणाले, “माझी कहाणी अमेरिकेच्या मोठ्या कहाणीत कुठे बसते, याचा शोध मला लागला.”

बराक यांना पक्षपाती कायद्यांना आव्हान द्यायचे होते. म्हणून, त्यांनी कायद्याचा अभ्यास सुरू केला. उन्हाळ्याच्या दिवसांत त्यांची भेट एक हुशार तरूण वकील मिशेल हिच्याशी झाली. बराक आणि मिशेल यांनी लग्न केले.





त्यांना दोन मुली झाल्या, मॅलिया आणि साशा.

सरकार लोकांना अधिक चांगल्या सुखसुविधा देऊ शकते, असे बराकना नेहमी वाटत असे. म्हणून, ते राज्याच्या वरिष्ठ कायदेमंडळाचे सदस्य बनले. 2004 साली ते देशाच्या वरिष्ठ कायदेमंडळाची निवडणूक जिंकले. उन्हाळी अधिवेशनात त्यांनी एक भाषणही दिले.



भाषणात त्यांनी आपल्या आईने शिकवलेल्या मूल्यांचा उल्लेख केला. “सगळे अमेरिकन एकसमान आहेत आणि सर्वांना समान हक्क आहेत,” असे ते म्हणाले, “आपण काळे अमेरिकन, गोरे अमेरिकन, लॅटिन अमेरिकन किंवा आशियाई अमेरिकन नसून फक्त अमेरिकन आहोत.”



बराक यांच्या शब्दांनी लोकांच्या मनात आशेचा किरण जागवला. तेव्हा अमेरिका युद्धाच्या छायेत वावरत होती. लोकांना नोकऱ्यांची गरज होती, आरोग्यसुविधांची गरज होती.

बराक यांचे भाषण ऐकून ‘लवकरच अमेरिकेत बदलाचे वारे वाहतील, अमेरिका अधिक प्रगती करेल’ असे लोकांना वाटू लागले. साहजिकच, बराक यांनी अध्यक्षपदाची निवडणूक लढवावी, असा आग्रह लोकांनी केला.



यापूर्वी कधी एक आफ्रिकी
अमेरिकन व्यक्ती
अमेरिकेच्या अध्यक्षपदी
निवडून आली नव्हती.
अमेरिकन लोक आफ्रिकी
अमेरिकन व्यक्तिला मत
देणार नाहीत, असेच
बहुतेकांना वाटत असे.
पण बराक लोकांना
चांगले ओळखत होते.
10 फेब्रुवारी 2007 रोजी
त्यांनी अध्यक्षपदाची
निवडणूक लढवत
असल्याचे जाहीर केले.



अमेरिकन लोक मिळून जग अधिक सुंदर कसे बनवू शकतात, या कामात मुलंसुद्धा मदत करू शकतात यांविषयी ते बोलत. “आपण प्रत्येकजण स्वत:च्या स्वप्नांचा शोध घेण्यास स्वतंत्र आहोत. पण आपल्याला एका सामायिक ध्येयासाठीही काम केले पाहिजे”, असे ते म्हणत.



महिनोंमहिने फिरून बराक यांनी संपूर्ण अमेरिका पिंजून काढली. मिळूनमिसळून काम करायचे, अमेरिकेत बदल घडवून आणायचा यांविषयी ते लोकांशी बोलत.

बराक यांच्या योजना ऐकून लोक उत्साहीत होत. लवकरच, प्रत्येक राज्यात बराक यांचे स्वयंसेवक तयार झाले. ते ओबामा यांच्या नावे केक विकत, मेजवान्या आयोजित करत आणि प्रचार करत.






त्यांनी जागोजागी बराक यांची छायाचित्रे चिकटवली, लोकांमध्ये पत्रके वाटली, घरोघरी जाऊन लोकांना बराक यांनाच मत देण्याचे आवाहन केले.

अखेरीस, निवडणुकीचा दिवस उजाडला. देशभरातील लोक मतदानासाठी घराबाहेर पडले. वृद्ध, तरूण, विविध वर्णांचे असे सुमारे तेरा कोटींपेक्षा जास्त लोक यांत होते.

मतदानाच्या लांबचलांब रांगांमध्ये लोक विनातक्रार उभे राहिले. काही दूर राहाणाऱ्या लोकांनी आपली मते टपालाने पाठवली. काही लोकांनी प्रथमच मतदान केले. आपले मत देऊन ते अमेरिकेच्या कहाणीचा एक हिस्सा बनले.





मतमोजणी झाल्यावर बराक विजयी झाल्याचे घोषीत करण्यात आले. सुमारे 6.7 कोटी लोकांनी बराक ओबामा यांना मत दिले होते. यापूर्वी कोणत्याही अध्यक्षाला एवढी मते मिळाली नव्हती.




गल्लोगल्ली लोक जल्लोष करू लागले. हार्लेमपासून हवाईपर्यंत आणि कॅन्ससपासून केनियापर्यंत लोक नाचू लागले, आनंदाने एकमेकांना मिठ्या मारू लागले.

अनेकांच्या डोळ्यांत आनंदाचे अश्रू तरळले. “अमेरिका हा असा देश आहे जिथे काहीही होऊ शकतं!” ओबामा म्हणाले.



बराक योग्य तेच बोलले.
20 जानेवारी 2009 रोजी बराक ओबामा अमेरिकेचे पहिले कृष्णवर्णीय अध्यक्ष बनले.
एक लाखापेक्षा जास्त लोक वॉशिंग्टन डी.सी. येथे हा सोहळा पाहाण्यास आले. काही लाख लोकांनी हा सोहळा टेलिव्हिजनवर पाहिला.

जगभरात सर्व वर्णांच्या, वंशांच्या लोकांनी नव्या अध्यक्षांचे भाषण ऐकले. त्यांच्या आईने शिकवलेल्या मुल्यांबाबत लोकांनी ऐकले. मिळून काम करणे आणि परस्परांना सहकार्य करणे यावर बराक बोलले. “आपल्या देशाचा अधिक चांगला इतिहास रचण्याची वेळ आली आहे,” असे म्हणून त्यांनी अमेरिकेच्या कहाणीचा एक नवा अध्याय सुरू केला.

ही कहाणी अद्याप पूर्ण झाली नाही. खरंतर, ती आता कुठे सुरू झाली आहे.



तुम्ही या अमेरिकेच्या कहाणीत कुठे बसता? तुम्ही तुमच्या आसपासच्या लोकांना किंवा जवळच्या शाळेला मदत करू शकता. मोठे होऊन तुम्हीसुद्धा अध्यक्ष बनू शकता. सगळं काही शक्य आहे. पुढे काय होणार, हे फक्त तुमच्यावरच अवलंबून आहे.



**समाप्त**